**विदर्भ व मराठवाड्यातील कृषिपंपांचे उर्जीकरण करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांना द्यावयाचे सहायक अनुदान सन २०१८-२०१९**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.निधीवि-२०१८/प्र.क्र.६९/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ ऑगस्ट, २०१८

संदर्भ : १) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४५/ ऊर्जा-५, दिनांक ३१.१०.२०१७
२) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१६२/ ऊर्जा-३, दिनांक २०.१२.२०१७
३) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१६२/ ऊर्जा-३, दिनांक ०६.०३.२०१८
४) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१६२/ ऊर्जा-३, दिनांक ३१.०३.२०१८
५) शासन परिपत्रक वित विभाग अर्थसं-२०१८/प्रक्र.६९/अर्थ-३ दि.०२.०४.२०१८
६) महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे क्र.मु.म.व्य.(सांघिक वित्त)/ १४ दि. २६.०६.२०१८

प्रस्तावना :-

विदर्भ व मराठवाड्यातील कृषिपंपाचे उर्जीकरण करण्यासाठी संदर्भाकीत शासन निर्णय क्र.१, दिनांक ३१.१०.२०१७ अन्वये शासनाने प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयान्वये विदर्भ व मराठवाड्यातील नवीन कृषि पंपाना विज जोडणी देऊन उर्जीकरणाच्या कार्यक्रमांतर्गत ९४,४६२ कृषि पंप वीज जोडण्यांसाठी रुपये ९१६.२० कोटी रक्कमेचे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सहाय्यक अनुदान द्यावयाचा कार्यक्रम मंजूर करण्यात आला आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांनी सदर योजनेसाठी केलेल्या तरतूदीमधून अनुदान वितरीत करण्याबाबत संदर्भिय क्र ६ येथील पत्रान्वये शासनास विनंती केली आहे.

२. सन २०१७-१८ मध्ये मागणी क्र. के-६, लेखाशिर्ष २८०१२६८९ खाली एकूण रुपये ५०८.०४ कोटी (मुळ रुपये ३५३.३० कोटी व डिसेंबर पुरवणी मागणी रुपये १५४.७४ कोटी ) तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली होती. मंजूर कार्यक्रमानुसार कृषि पंपाचा प्रादेशिक असमतोल दूर करणे बाबतची अनुशेष व निर्देशांक समितीच्या अनुशेषानुसार तरतूद रूपये ८७.३० कोटी वगळता उर्वरित तरतूद शासन निर्णय दिनांक २०.१२.२०१७ अन्वये रुपये २६६.०० कोटी, शासन निर्णय दिनांक ०६.०३.२०१८ अन्वये रुपये १२३.७९ कोटी व शासन निर्णय दिनांक ३१.०३.२०१८ अन्वये रुपये ३०.९५ कोटी याप्रमाणे एकूण रुपये ४२०.७४ कोटी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. नवीन कृषि पंपाना विज जोडणी देण्याबाबतच्या रुपये ९१६.२० कोटी रक्कमेच्या मंजूर

कार्यक्रमातील सदर वितरीत रुपये ४२०.७४ मधून ४३३६४ कृषि पंप वीज जोडण्यां देण्याची कार्यवाही करण्यात आली आहे.

३. मंत्रीमंडळाच्या दिनांक १०.१०.२०१७ च्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार विदर्भ व मराठवाडा विभागामध्ये कृषि पंप विद्युतजोडणी देण्याची योजना स्वतंत्रपणे राबविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष २८०१५५१६ उघडण्यात आले असून त्याखाली सन २०१८-१९ मध्ये रुपये ७०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. तसेच अनुशेष व निर्देशांक समितीच्या अनुशेषानुसार कृषि पंपाचा प्रादेशिक असमतोल दूर करणेसाठी मागणी क्र. के-६, लेखाशीर्ष २८०१२८६९ खाली रूपये ५० कोटी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. नवीन कृषि पंपाना विज जोडणी देण्याबाबतच्या रुपये ९१६.२० कोटी रक्कमेच्या मंजूर कार्यक्रमातील सन २०१७-१८ मध्ये रुपये ४२०.७४ तरतूद संदर्भ क्र. २, ३ व ४ येथिल शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली असून सदर कार्यक्रमासाठी आता संदर्भ क्र. ६ येथिल प्रस्तावाच्या अनूषंगाने निधी वितरणाची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रुपये ३१२.३७ कोटी (रुपये तीनशे बारा कोटी सदोतीस लाख फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

२. वरील बाबीचा खर्च "मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १९९, इतर अशासकीय संस्थंना सहाय्य, (००) (०२) विदर्भ व मराठवाडा विभागातील कृषी पंपांना वीज जोडणी देणे (कार्यक्रम) (२८०१५५१६) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षामध्ये, सदर योजनेसाठी मंजूर असलेल्या रु.७००.०० कोटी इतक्या तरतूदी मधुन भागविण्यात यावा.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना. रा. ढाणे, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. उ.द. वाळुंज, सह सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रुपये ३१२.३७ कोटी (रुपये तीनशे बारा कोटी सदोतीस लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नांवे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता रु.७००.०० कोटीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. तसेच या लेखाशिर्षाअंतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. वितरीत करण्यात येत असलेला निधी रु.३१२.३७ कोटी वित विभागाच्या संदर्भिय क्र.५ येथील शासन परिपत्रकानुसार ७०% च्या मर्यादेत आहे.

५. महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१८/परिपत्रक क्रमांक अर्थसंकल्प २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३. दि.०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र. ३ ते १० ची पूर्तता होत आहे, तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टामधील सर्व १ ते ८ अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८०८०४१३१८१८६०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2018.08.04 16:31:54 +05'30'

**(ना. रा. ढाणे)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बॅंक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई
३) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा / विधानपरिषद महाराष्ट्र विधान मंडळ, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१, मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१०) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
११) कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१२) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१३) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.